# क्लारा आणि घोड़ागाड़ी लायब्ररी

नैन्सी स्माइलर लेविंसन, चित्र: कैरोलिन क्रॉल
मराठी: अश्विनी बर्वे

# क्लारा आणि घोड़ागाड़ी लायब्ररी

नैन्सी स्माइलर लेविंसन

चित्र: कैरोलिन क्रॉल

मराठी: अश्विनी बर्वे

## अनुक्रम

1. शेतावर

2. शहरातला प्रवास

3. काळी वॅगन

4. क्लारासाठी पुस्तके

# १
# शेतावर

क्लारा मैरीलँडमध्ये एका छोट्याशा शेतावर राहत होती.

ती कोंबड्यांना खायला घालायला मदत करे, स्वयंपाक करायला मदत करत असे. ती छोट्या हंस आणि ऐन बाळाकडे लक्ष देत असे.

वसंत ऋतूत ती वडिलांना मका
पेरायला मदत करत असे.

क्लारा शाळेत जात नसे.
शेतावरच्या मुलांसाठी तिथे
कोणतीही शाळा नव्हती.

पण क्लाराला शिकायची इच्छा होती. तिला सूर्य आणि तारे यांच्याबद्दल समजून घ्यायचे होते.

पण त्यापेक्षाही महत्वाचे म्हणजे तिला वाचायला शिकायचे होते. एकदा चर्चची प्रार्थना संपल्यावर रेवरेंड स्ट्रॉन्ग यांनी, क्लाराला आपले बायबल दाखवले.

“केवढे मोठे बायबल आहे!”

क्लारा म्हणाली.

“आणि यात खूप सुंदर कहाण्या आहेत,” रेवरेंड स्ट्रॉन्ग म्हणाले.

क्लाराला गोष्टी ऐकायला खूप आवडत असे. रविवारी चर्चमध्ये कहाणी ऐकायला तिला आवडत असे.

कधी–कधी स्वतःच कहाणी

तयार करत असे.

त्या काही प्राण्यांबद्दल असत,

तर काही परिवाराबद्दल असत.

आणि काही शेतावर राहणाऱ्या

एका मुलीबद्दल असत.

जी अगदी तिच्यासारखी होती.

जर ती कहाणी वाचू शकली असती तर,

ती विचार करे.

जर तिच्याजवळ तिचे गोष्टीचे

पुस्तक असते तर.

पण तिच्या कुटुंबाकडे

या गोष्टींसाठी पैसे नव्हते.

कधीकधी क्लारा शेतावर

काम करतांना थकून जाई.

मग ती गवतावर लोळे.

किंवा तिच्या वडिलांनी तयार

केलेल्या झुलत्या खुर्चीवर

झुलत राही आणि स्वप्नं बघे.

एक दिवस क्लारा,

आईला पाव करण्यासाठी मदत करत होती.

“आई” तिने विचारले.

"भट्टी मध्ये पाव कसा फुलतो?”

“अग बाळा,” आई म्हणाली,

“मी ते तुला आत्ता सांगू शकत नाही कारण मी कामात आहे ना.”

क्लाराने भट्टीचा दरवाज़ा उघडला ज्यामुळे तिला आत बघता येईल.

तिने पावाचा विचार केला.

तिने विचार केला तर

पाव फुलत राहिला तर

काहीवेळाने तो फुगून

भट्टीच्या बाहेर येईल.

मग क्लाराला खूप हसू आले.

"दरवाज़ा बंद कर, क्लारा,"

आई म्हणाली. “हो आई,”

क्लारा म्हणाली.

ती झुलत्या खुर्चीवर बसली

आणि मागेपुढे हलत राहिली.

मागे पुढे

स्वयंपाकघराचे दार उघडत बाबा आता आले.
ते गरमीमुळे थकलेले वाटत होते.

त्यांच्या बुटावर धूळ साचली होती.

“तू परत स्वप्नं बघायला लागलीस का?”
त्यांनी क्लाराला विचारले.

“हो, बाबा," ती म्हणाली.

“शेत काम करण्यासाठी असते,

स्वप्नं बघायला नाही,” बाबा म्हणाले.

“प्रत्येकाने मदत करायला पाहिजे, नाहीतर
आपल्याकडे खायला काही राहणार नाही.”

“हो, बाबा," क्लारा म्हणाली.

छोटा हंस स्वयंपाक घरात पळत आला.
“खायला, खायला दे,” तो ओरडला.

“अजून जेवायची वेळ झाली नाही,”

आई म्हणाली.

“हंस इकडे ये," क्लारा म्हणाली.

“आपण टेबल लावू या.

मग मी तुला एक गोष्ट सांगेल.”

“मी लाकडे फोडायला जातो.”

बाबा म्हणाले.

“ठीक आहे,” आई म्हणाली,

“तोपर्यंत स्वयंपाक तयार होईल.”

## २.
## शहरात प्रवास

क्लारा आणि आई कपडे धूत होत्या.

“आई! क्लारा! बाबांनी हाक मारली,

“मला शहरात जायचं आहे.

आपल्याला मक्याचे बी लागणार आहे.”

आई म्हणाली, “आपल्याला कणिक

आणि साखर पण पाहिजे आहे.”

“मी तुमच्याबरोबर येऊ का?”

क्लाराने विचारले.

“मी तुम्हाला नक्की मदत करेन.”

बाबा हसले, “मग चल माझ्याबरोबर,”

ते म्हणाले.

क्लाराने बाबांना घोडागाडी जोडायला

मदत केली पापा की घोड़ागाड़ी केली.

शहर खूप लांब होते जवळपास सात मैल.

“आपण सूर्यास्ता पर्यंत परत येऊ,”

बाबांनी आईला सांगितले.

आईने टाटा केला.

हंसने पण टाटा केला.

छोटी एन रडू लागली.

टप टप टप.

घोडा हळूहळू पुढे जात होता.

ऊन होते,

वसंतातल्या हवेचा गंध सुटला होता.

क्लारा आणि बाबा तोपर्यंत प्रवास करत राहिले
जोपर्यंत ते एका नाल्याजवळ पोहचले नाही.

त्यांनी गाडी उतारावर थांबवली.

क्लारा नाल्याकडे पळाली

आणि तिने आपल्या हाताने स्वच्छ,

थंड पाणी प्यायलं.

"किती गोड आहे, बाबा,"

क्लारा म्हणाली.

बाबांनी पण पाणी प्यायलं.

मग त्यांनी आपल्या चेहऱ्यावर

पाणी शिंपडले.

“खूप छान वाटतं आहे,” ते म्हणाले.

मग बाबांनी घोड्यांना पाणी प्यायला दिलं

“बाबा, तुम्हाला माहीत आहे का की अजून
काय चांगलं लागेल. क्लाराने विचारलं.

“काय?“ बाबांनी विचारलं.

"पेपरमिंटची एक गोळी,"

क्लारा म्हणाली.

“शहराचा प्रवास पेपरमिंटच्या
गोळी शिवाय अपूर्ण होईल,”
बाबा म्हणाले.

क्लारा आणि बाबा परत गाडीत बसले
आणि पुढे जाऊ लागले.

शेवटी ते शहरात पोहचले.

मिस्टर होलज़र यांनी

आपल्या दुकानात त्यांचे स्वागत केले.

“हवा छान आहे,” ते म्हणाले.

“हो,” बाबा म्हणाले.

“पेरणीसाठी चांगली हवा आहे.”

क्लाराने दुकानात चार बाजूला बघितलं.

तिथे शिलाईसाठी  दोरा होता.

स्वयंपाक करण्यासाठी भांडी होती.

मग क्लाराने पुस्तके बघितली.

पुस्तकांनी भरलेले एक कपाट?

क्लाराने एक पुस्तक काढले आणि

ते उघडले.

त्यात खूप सारे अक्षरे होती.

खूप सारे शब्द होते.

ते बघून क्लाराला चक्करच आली.

"अच्छा, अच्छा,"

मिस्टर होलज़र म्हणाले, “तर तुला पुस्तक उधारीवर घ्यायचं आहे.

“याची किंमत किती आहे?”

“याची किंमत एक पैसा सुद्धा नाही.

हे लायब्ररीचे पुस्तक आहे.

मिस्टर होलजर म्हणाले.

“माझे दुकान एक बुक स्टेशन आहे.”

“पुस्तक उधार घेण्यासाठी काहीच खर्च येणार नाही का? क्लाराने विचारले.

“हो बरोबर, काहीच खर्च येणार नाही. “मिस्टर होलजर म्हणाले,

“पुस्तक एकदम मोफत आहे.”

“पुस्तके श्रीमंत लोकांसाठी असतात,”

ते म्हणाले.

“आपल्या सारख्या शेतकऱ्यांकडे

वाचण्यासाठी वेळ कुठे आहे.”

बाबांनी पुस्तक परत कपाटात ठेवले.

क्लाराचे डोळे भरून आले.

क्लारा बाबांजवळ पळत गेली.

“बाबा, बघा ना!”

“मी मोफत पुस्तक घेऊ शकते.

मला वाचायला शिकायचं आहे.”

बाबा हसले नाही

त्यांनी क्लाराच्या पाठीवर थोपटले.

बाबांनी क्लाराला

एक पेपरमिंटची स्टिक दिली.

“हे घे, क्लारा,“ ते म्हणाले.

“तू तर आपली पेपरमिंट कैंडी

विसरलीच होती.

“चल!

आता गाडी भरण्याची वेळ झाली आहे.

घरी जायची वेळ झाली आहे.”

## ३.
## काळी वॅगन

उन्हाळ्यातल्या एका दिवशी

क्लारा आणि तिचे बाबा बागेत

निंदणी करत होते.

"क्लारा!" आईने हाक मारली.

“मी ब्लू बेरीचा जॅम करणार आहे.

तुला ब्लू बेरी तोडायला आवडेल का?”

“व्वा!, हो," क्लारा म्हणाली.

तिने बाबांकडे बघितले. ते हसले.

“तू बऱ्याच दिवसांपासून निंदत आहे,”

ते म्हणाले.

“आता मी ते काम पूर्ण करेन.”

क्लाराने बादली गेली

आणि जंगली ब्लू बेरीच्या शेताकडे

पळाली.

ती ब्लू बेरी तोडत गाऊ लागली.

अचानक रस्त्यावर काहीतरी

येतांना तिने बघितले.

ती एक मोठी काळी गाडी होती.

तिला दोन घोडे खेचत होते.

ती एक महिला चालवत होती.

तिने हात हलवला आणि ती थांबली.

क्लाराने गाडीकडे रोखून बघितलं.

गाडी पुस्तकांनी भरलेली होती.

"हॅलो," महिला म्हणाली.

“मी मिस. मेरी, लायब्रेरियन आहे.

आणि तू कोण आहे?”

क्लाराने मिस मेरीला

आपले नाव सांगितलं.

“तुम्ही शहरापासून एवढे दूर

गाडी चालवत आल्या?” क्लाराने विचारले.

“हो," मिस मेरीने म्हटलं.

“तुला आमची चालतेफिरते वाचनालय
आवडले का?

“हो हो," क्लाराने म्हटले.

“मला माहीत नव्हते की जगात एवढी
पुस्तके आहेत.”

मिस मेरी म्हणाली,

“आमच्याजवळ कुमारांसाठी पुस्तके आहेत,
मोठ्या माणसांसाठी पुस्तके आहेत.

आणि आमच्याकडे इतर लोकांसाठी सुद्धा
पुस्तके आहेत.”

“तुमच्याकडे माझ्या वयाच्या मुलीसाठी एखादं पुस्तक आहे का?”

क्लाराने विचारले.

“हो," मिस  मेरीने म्हटले.

“आमच्याकडे बदक आई आणि बदक वडील आहे.

आमच्याकडे *द विजर्ड ऑफ ओज* आहे आणि *जादुई ओजची* सगळी पुस्तके आहेत.

आमच्याकडे

*द रॅबिट विच*

आणि *पीटर पॅन* आहे आणि सगळ्या प्रकारच्या कविता आहेत.”

क्लारा मोठ्या मुश्किलीने बोलली.

“तुला एखादं पुस्तक उधार घ्यायचं आहे का?” मिस मेरीने विचारलं.

“तू ते माझ्या पुढच्या

भेटीपर्यंत ठेवू शकते.”

“मला असं करता आलं असतं तर,” क्लारा म्हणाली.

“पण बाबा म्हणाले की शेतात मेहनत करणाऱ्या लोकांसाठी पुस्तक वाचणे म्हणजे वेळ वाया घालवणे आहे.”

"बकवास," मिस मेरी म्हणाली.

“चल, आपण जाऊन तुझ्या

बाबांशी बोलू या. ये गाडीत बस.”

क्लारा घाईने पुस्तकांच्या गाडीत बसली.

## ४.
## क्लारासाठी पुस्तके

टपटप! टपटप!

मिस मेरीने घोड्यांना पुढे हाकलले

टॉक! टॉक!

वॅगन धुळीतल्या रस्त्यावरून पुढे गेली.

किती अद्‌भुत आहे!

क्लाराने विचार केला.

मी एका पुस्तकांच्या गाडीत बसले आहे.

आणि त्यात बसून घरी जात आहे.

बाबा काय विचार करतील?

धड़ाम! धड़ाम!

त्या शेतातल्या मोकळ्या जागेत जाऊन पोहचल्या.

बाबा रागाने बघत होते. “तुम्ही चूक केली आहे,” ते ओरडत म्हणाले.

“आमच्याकडे कोणी मृत व्यक्ती नाही,”

“ही मृत व्यक्तींना घेऊन जाणारी गाडी नाही,” मिस मेरी म्हणाली.

“मी मेरी टिटकॉम्ब आहे, लायब्रेरियन. आणि हे पहिले चालते-फिरते वाचनालय आहे.”

वडिलांनी भुवया उंचावल्या.

“मी त्या लोकांना पुस्तके देते जे दूर खेड्यात राहतात,” मिस मेरी म्हणाली.

“ऊफ,” वडील म्हणाले.

“आमच्या शेतात, एका पुस्तकांच्या गाडीसाठी योग्य जागा नाही”.

“ही पुस्तकांची गाडी सगळ्या शेतांवरच्या लोकांसाठी आहे.” मिस मेरीने बाबांना सांगितले.

“ही पुस्तके सगळ्या लोकांसाठी आहेत.”

“आम्ही खूप कामात आहोत,”

बाबा म्हणाले.

"धन्यवाद आणि शुभ दिन."

“कष्ट करणाऱ्या लोकांनी कधीतरी आराम सुद्धा केला पाहिजे.”

मिस मेरीने म्हटले.

“वाचणे ही एक मजेशीर गोष्ट आहे. वाचल्याने आपल्याला आपल्या कामाची जास्त माहीती मिळते, आपण नवीन गोष्टी शिकू शकतो.”

क्लारा वडिलांकडे धावत गेली.

“प्लिज, बाबा," ती म्हणाली.

बाबांनी मिस मेरीकडे बघितले.

“मला माहीत आहे की क्लाराला एक पुस्तक पाहिजे आहे,” ते म्हणाले.

“पण तिला वाचता येत नाही.”

“जर क्लाराला वाचण्याची इच्छा आहे,”
मिस मेरी म्हणाली.

“तर ती लवकरच शिकेल.”

वडिलांनी आपली मान खाली घातली,

"ठीक आहे, मी ...आई आणि मी
आम्हाला थोडे फार वाचायला येते,”

बाबा म्हणाले.

“मी क्लाराला वाचायला शिकवू शकते,”
मिस मेरी म्हणाली.

क्लाराने बाबांची बाही ओढली,

“प्लीज बाबा,” ती म्हणाली.

“मी तोपर्यंत पुस्तक वाचणार नाही
जोपर्यंत माझे सगळे काम संपणार
नाही.

“क्लारा वडिलांच्या उत्तराची वाट बघत
होती.

शेवटी बाबा म्हणाले, “मला माहीत आहे तू तुझा शब्द नक्की राखशील.”

“हो! हो! हो!” क्लारा हसत म्हणाली.

बाबांनी श्वास सोडला.

“ठीक आहे, क्लारा

तू एक पुस्तक उधार घेऊ शकते.”

"ओह, धन्यवाद, बाबा!" क्लारा आनंदाने म्हणाली.

क्लारा पुस्तकाच्या गाडीकडे धावली.

"मिस मैरी, तुम्ही पुस्तक शोधायला मला मदत कराल का?" तिने विचारले.

"ज़रूर," मिस मेरी म्हणाली.

"सुरु करण्यासाठी हे वर्णमालेचे पुस्तक आहे आणि पऱ्याच्या कहाणीचे एक चित्र पुस्तक आहे. मी तुला शब्दांचे उच्चार कसे करायचे ते दाखवते".

क्लाराने वर्णमाला पुस्तक बघितले.

तिने पऱ्याचे पुस्तक बघितले.

"मला गोष्टी पाहिजे," ती म्हणाली.

"मला वाचण्यासाठी गोष्टी पाहिजे."

ही कथा देशातील पहिल्या फिरत्या "बुक वॅगन" च्या सत्य कथेवर आधारित आहे. मेरी लेमिस्ट टिटकोम्ब या हेगर्सटाउन, मेरीलँड येथील सार्वजनिक ग्रंथालयाच्या प्रमुख झाल्या. त्यानंतर लवकरच, त्यांनी शहरापासून दूर राहणाऱ्या लोकांना पुस्तके उपलब्ध करून देण्याचा निर्णय घेतला. सुरुवातीला, त्यांनी संपूर्ण काउंटी परिसरात जनरल स्टोअर्स, चर्च आणि घरांमध्ये छोटे “बुक डिपॉझिट स्टेशन" उभारले. त्यानंतर १९०५ मध्ये त्यांनी एक घोडागाडी डिझाइन केली जी शेकडो पुस्तके दुर्गम गावांमध्ये वाहून नेऊ शकते. ग्रंथालयाचे रखवालदार, जोशुआ थॉमस, पुस्तकांची गाडी चालवणारे चालक बनले. ते नियमितपणे ५०० चौरस मैलांचा बॅक-रोड परिसर व्यापत असे. पहिले “फिरते वाचनालय “पाच वर्षे टिकले पण रेल्वे क्रॉसिंगवर ट्रेनने धडक दिल्याने ते नष्ट झाले. सुदैवाने चालक आणि घोडे सुरक्षित राहिले. १९१२ मध्ये जेव्हा नवीन फिरते वाचनालय तयार करण्यात आले तेव्हा ते ओढण्यासाठी घोड्याची आवश्यकता नव्हती. मेरीलँडच्या दुसऱ्या फिरत्या लायब्ररीमध्ये इंजिन होते!